१५१/५

महाराष्ट्र राज्य लॉटरी
दि. ०६ जानेवारी २०११ पासून काढण्यात येणा-या **"आकर्षक पुष्कराज"**या सोडतीची बक्षीसरचना व कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय क्र.सोडत १०१०/ प्रक्र२१०/ उ.स.(वि.व ले.)/लॉटरी ३
नवीन प्रशासन भवन , ८ वा मजला , मंत्रालयासमोर,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक : .8 DEC 2010

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या निरनिराळया पारंपारिक साप्ताहिक सोडती रविवार खेरीज इतर दिवशी काढण्यात येतात. या साप्ताहिक सोडतीमध्ये आठवडयाच्या प्रत्येक गुरुवारी **"आकर्षक पुष्कराज"** या नावाने साप्ताहिक सोडत काढण्यात येते.

१. या साप्ताहिक सोडतींच्या बक्षिसरचनेत शासनाने गुरूवार दि. ०६ जानेवारी २०११ पासून काढण्यात येणा-या सोडतीपासून बदल करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. **"आकर्षक पुष्कराज"**ही साप्ताहिक सोडत केंद्र शासनाचा लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केली आहे. त्यामधील प्रमुख मुद्दे खालील प्रमाणे आहेत.

(अ) शासनाने महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या साप्ताहिक**"आकर्षक पुष्कराज"** या सोडतींसाठी प्रत्येक मालिकेत ६०,००० तिकीटे असलेल्या पाच मालिकांत मिळून ३ लाख तिकीटे मुद्रीत करण्याचा निर्णय घेतला आहे. या सोडतीत पहिले बक्षिस रू. १२ लाखाचे एक सामायिक बक्षिस ठेवण्यात आलेले आहे.

(ब) साप्ताहिक **"आकर्षक पुष्कराज"** सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि.व ले.)महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू.),मुबई-१५ यांचे कार्यालयातून सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील.

या बक्षिसरचनेतील रु. ५,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान बक्षिस विजेत्यांना केल्याबद्दल त्याच्या प्रतिपूर्तीनंतर विक्रेत्यांना २ % सेवाआकार देण्यात येईल.

या सोडतीची तिकीट विक्री उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी यांच्या कार्यालयातून करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावर (M.R.P. Rs. 20/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| अ.क्र. | तिकीटांची संख्या | घाऊक सूट |
|---|---|---|
| १ | ००,००० ते ५९,९९९ तिकीटांपर्यंत | २२ % |
| २ | ६०,००० ते ७९,९९९ तिकीटे | २८ % |
| ३. | ८०,००० ते ९९,९९९ तिकीटे | ३० % |
| ४ | १००००० ते ३००००० तिकीटे | ३२% |

दि. ०६ जानेवारी २०११ पासून काढण्यात यावयाच्या आकर्षक पुष्कराज या साप्ताहिक सोडतींची बक्षिसरचना पुढीलप्रमाणे असेल.

या सोडतीत एकूण ५ मालिका असून प्रत्येक मालिकेत ६०००० तिकीटे याप्रमाणे एकूण ३ लाख तिकीटे मुद्रीत करण्यात येणार आहेत. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक १०,००० ते ६९,९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत.

## आकर्षक पुष्कराज सोडतीची बक्षिस योजना

५ मालिका AP1101A ते AP1101E
तिकीटांचे क्रमांक १०,००० ते ६९,९९९
सोडत दिनांक ०६/०१/२०११ पासून
वेळ सायं ४.३० वा.

प्रत्येक मालिकेत ६०,००० तिकिटे
एकूण तिकिटे ३ लाख
तिकीटांची किंमत रू.२०/-

| बक्षीसे | बक्षीसाची रक्कम रूपये | प्रत्येक मालिकांत मिळून एकूण संख्या | सर्व मालिकांत मिळून एकूण संख्या | सर्व मालिकांत मिळून बक्षीसाची एकूण रक्कम रूपये | विक्रेता बोनस | एकूण बोनस |
|---|---|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षीस (पूर्ण क्रमांक) | १२,००,००० | -- | १ | १२,००,००० | १५००० | १५००० |
| दुसरे बक्षीस प्रत्येक मालिकेत (पूर्ण क्रमांक) | १,००,००० | १ | ५ | ५,००,००० | २००० | १०००० |
| तिसरे बक्षीस प्रत्येक मालिकेत (पूर्ण क्रमांक) | ५,००० | १ | ५ | २५,००० | २०० | १००० |
| चौथे बक्षीस प्रत्येक मालिकेत (शेवटचे ४अंक) | २,००० | ६ | ३० | ६०,००० | | |
| पाचवे बक्षीस प्रत्येक मालिकेत (शेवटचे ४अंक) | १,००० | ६ | ३० | ३०,००० | | |
| सहावे प्रोत्साहनपर बक्षीस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या पुढील तसेच मागील प्रत्येकी दहाव्या क्रमांकास रू. ५०/- चे बक्षिस देण्यात येईल ) | ५० | | ३०००० | १५,००,००० | | |
| **एकूण** | | | **३०,०७१** | **३३,१५,०००** | | **२६०००** |

वरील बक्षिसरचनेत विक्रेता बोनसचा ही समावेश करण्यात आला आहे. ज्या विक्रेत्याने पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसपात्र तिकीटाची विक्री केली आहे त्याला ~~प्रत्येकी~~ रू. १५,०००/- बोनस, दुसऱ्या व तिसऱ्या क्रमांकाच्या बक्षिसपात्र तिकीटाची विक्री करणाऱ्या विक्रेत्यास प्रत्येक बक्षिसपात्र तिकीटामागे अनुक्रमे रू. २,०००/- व रू. २००/- बोनस इतका बोनस देण्यात येईल. असे एकूण रू. २६०००/- इतकी रक्कम विक्रेता बोनस म्हणून देण्यात येईल.

**४. सोडतीची कार्यपध्दती :-**

साप्ताहिक "**आकर्षक पुष्कराज**" या सोडतींकरीता सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा ठिकाणी ६ ड्रम ठेवले जातील प्रत्येक मालिकेमध्ये १०,००० ते ६९,९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे क्रमांक असतील, दुसऱ्या ड्रममध्ये १ ते ६ अंकाची प्रत्येकी एक याप्रमाणे ६ चकत्या टाकण्यात येतील. बाकी ४ ड्रम्समध्ये ० ते ९ अंकाच्या प्रत्येकी एक चकती याप्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात(पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम्स एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम्स एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रम्समधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील

या सोडतींमधील दुसऱ्या क्रमांकाच्या रु. १,००,०००/- व तिसऱ्या क्रमांकाच्या रू. ५०००/- च्या बक्षिसाकरिता प्रत्येंक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येतील त्यानंतर या सोडतींमधील चौथे, पाचवे बक्षीस निश्चित करण्याची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

**चौथे बक्षीस रू. २०००/-** चौथ्या रु. २,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाची एक जुळवणी त्या त्या मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा एक अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. २,०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**पाचवे बक्षीस रू. १०००/-** पाचव्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाची एक जुळवणी त्या त्या मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा एक अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १,०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**सहावे प्रोत्साहनपर बक्षिस रू. ५०/- चे काढण्याची कार्य पध्दती :-**

सहाव्या बक्षीसासाठी कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येक १०व्या क्रमांकास रू. ५०/- चे सहावे प्रोत्साहनपर बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

**वरील सर्व मालिकांचे बक्षिस विजेते क्रमांक काढल्यानंतर पहिले (सामायिक) बक्षिस काढण्यात येईल.**

**पहिले सामायिक रू. १२, ००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्य पध्दती :-**

या साप्ताहिक सोडतीमध्ये **पाच मालिकात मिळून रूपये बारा लाखाचे एक (सामायिक) पहिले बक्षीस** ठेवण्यात आलेले असून त्यासाठी प्रथमतः पाच मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी(पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ४ (अ) मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत क्रमांकांची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

या सोडतीमध्ये कोणत्याही बक्षिसामध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास ते नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम्स किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक ........... असा आहे.

२०११०२०४१२१२८०६००१

(अ. मा. आत्राम )
उपसंचालक, राज्य लॉटरी तथा
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

१. राज्य लॉटरी मंडळाचे सर्व सदस्य.
२. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
३. आयुक्त माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. उपसंचालक(वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी, पूर्व , मुंबई १५.
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, प्रशासन -४.
९. निवड नस्ती लॉटरी - ३.